**प्रा. संपतराव अंबादास जळके, सदस्य, राज्य अन्न आयोग यांच्या पदावधीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- राअआ-२०२१/प्र.क्र. ३५/नापु २२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २९ एप्रिल, २०२२

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः असुका-२०१७/प्र.क्र.७४/नापु २२, दिनांक: ११ एप्रिल, २०१७.

२) शासन अधिसूचना दिनांक: ११ एप्रिल, २०१७.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्यामध्ये दिनांक १ फेब्रुवारी, २०१४ पासून राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ ची अंमलबजावणी सुरू झालेली आहे. सदर अधिनियमातील कलम १६ (१) अन्वये अधिनियमाच्या अंमलबजावणीवर संनियंत्रण व पुनर्विलोकनाच्या प्रयोजनार्थ "राज्य अन्न आयोग" गठीत करण्याची तरतूद करण्यात आली आहे. त्यानुषंगाने संदर्भाधीन दिनांक ११ एप्रिल, २०१७ च्या शासन निर्णयान्वये "राज्य अन्न आयोग" गठीत करण्यात आला आहे.

राज्य अन्न आयोगाच्या सदस्यांच्या पदावधीबाबत राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ च्या कलम १६ (४) मध्ये तरतूद करण्यात आली असून ती पुढीलप्रमाणे आहे:-

**"अध्यक्ष व इतर प्रत्येक सदस्य, ते पदावर दाखल होतील त्या दिनांकापासून पाच वर्षापेक्षा अधिक होणार नाही, इतक्या कालावधीकरीता पद धारण करतील आणि ते पुनर्नियुक्तीसाठी पात्र असतील, तथापि, कोणतीही व्यक्ती त्याच्या वयाची पासष्ट वर्षे पूर्ण केल्यानंतर अध्यक्ष किंवा इतर सदस्य म्हणून पद धारण करणार नाही."**

प्रा. संपतराव अंबादास जळके, सदस्य, राज्य अन्न आयोग यांचा पदावधी दि. १०.४.२०२२ रोजी पूर्ण होत आहे. त्यानुषंगाने राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ च्या कलम १६ (४) मधील उपरोक्त तरतूदीनुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ च्या कलम १६ (४) मधील तरतूदीनुसार प्रा. संपतराव अंबादास जळके, सदस्य, राज्य अन्न आयोग यांचा प्रस्तुत पदावरील कार्यकाळ दि. १०.४.२०२२ (म. नं.) रोजी संपुष्टात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२९११३५२६९२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

HEMANT RAGHUNATH WADIKAR

Digitally signed by HEMANT RAGHUNATH WADIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD, CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a86b6b8d4e10ec96013ed30baa14b147cd876b5706b47cdd8e000a7cb539c518, pseudonym=2644D293D936C8C5FED0D5B26B1B499CB1328E84, serialNumber=29AC0FE0F2878DA92CEED8F2EC3F18AEBB2FC0931A3DB3F75CA10DDDD8497A92, cn=HEMANT RAGHUNATH WADIKAR
Date: 2022.04.29 11:37:17 +05'30'

**( हेमंत वाडीकर )**
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,
५. मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,

६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधान भवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
८. सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
१०. ॲड. महेश ढवळे, अध्यक्ष, राज्य अन्न आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. प्रा. संपतराव अंबादास जळके, सदस्य, राज्य अन्न आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. सदस्य (सर्व), राज्य अन्न आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. सर्व मंत्रालयीन विभाग,
१४. सर्व विभागीय आयुक्त,
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
१७. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
१८. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१९. सर्व उप आयुक्त (पुरवठा),
२०. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
२१. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,
२२. सर्व अधिकारी (सचिव वगळून), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
२३. सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
२४. सदस्य सचिव, राज्य अन्न आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई
२७. सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
२८. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक,
२९. निवडनस्ती (कार्यासन नापु-२२).